न्यायालयीन आदेशानुसार ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई या संस्थेच्या आस्थापनेवरील तात्पुरत्या नियुक्तीने कार्यरत एकूण १२ चतुर्थश्रेणी बदली कर्मचा-यांची सेवा नियमित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

## शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-०२१६/प्र.क्र.१११/१६/वैसेवा-४,

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार,
नवीन गो.ते.रु.इमारत, ९ वा मजला,मुंबई - ४०० ००१.
तारीख: १७ डिसेंबर, २०१८.

वाचा :-

१) **शासन निर्णय क्रमांकः** वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्र. न्यायाप्र-०११५/ प्र.क्र.३८/१५/वैसेवा-४, दि. २३.७.२०१५

२) **शासन निर्णय क्रमांकः** वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्र. न्यायाप्र-०११५/ प्र.क्र.३८/१५/वैसेवा-४, दि. ७.१२.२०१५

३) मुळ अर्ज क्र. १९९/२०१६ या प्रकरणात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई यांनी पारीत केलेला दि.१५.६.२०१७ रोजीचा न्यायनिर्णय.

प्रस्तावना:-

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त विविध संस्थांच्या आस्थापनेवर तात्पुरत्या नियुक्तीने कार्यरत चतुर्थश्रेणी बदली कर्मचाऱ्यांनी त्यांची सेवा नियमित करण्यात यावी म्हणून अनेक न्यायालयीन प्रकरणे दाखल केली होती. यास्तव मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेनुसार एकुण ७७४ चतुर्थश्रेणी बदली कर्मचाऱ्यांची पात्रता तपासण्यात येऊन त्यापैकी ६२६ चतुर्थश्रेणी बदली कर्मचाऱ्यांच्या तात्पुरत्या सेवा काही अटी व शर्तीच्या अधीन राहून संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये दि. ७.१२.२०१५ पासून नियमित करण्यात आल्या. या ७७४ कर्मचाऱ्यात समाविष्ट नसलेल्या व त्यामुळे तात्पुरती सेवा नियमित होण्याबाबतचा लाभ न मिळालेल्या ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय या संस्थेच्या आस्थापनेवरील एकुण १२ चतुर्थश्रेणी बदली कर्मचाऱ्यांनी सदर लाभ मिळावा म्हणून मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र. १९९/२०१६ दाखल केला होता. या न्यायालयीन प्रकरणाचा न्यायनिर्णय मा. न्यायाधिकरणाने दि.१५.६.२०१७ रोजी अर्जदाराच्या बाजूने पारीत करुन उपरोल्लेखित ६२६ कर्मचाऱ्यांप्रमाणेच या १२ कर्मचाऱ्यांच्या तात्पुरत्या सेवा दि. ७.१२.२०१५ पासून नियमित करण्याबाबत आदेश दिले आहेत. या न्यायनिर्णयास मा. उच्च न्यायालयात आव्हान देण्यात येऊ नये, असे अभिप्राय विधी व न्याय विभागाने दिले असल्यामुळे सदर

न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार प्रस्तुत प्रकरणी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय:-

ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई या संस्थेच्या आस्थापनेवर तात्पुरत्या नियुक्तीने कार्यरत या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद केलेल्या एकुण १२ चतुर्थश्रेणी बदली कर्मचाऱ्यांची सेवा मुळ अर्ज क्र. १९९/२०१६ या प्रकरणात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी दिलेल्या आदेशानुसार खालील अटींच्या अधीन राहून दि. ७.१२.२०१५ पासून नियमित करण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

१. संबंधित कर्मचा-यांची नियुक्ती नियमित करताना त्यास बदली कर्मचारी म्हणून दिलेल्या प्रथम नियुक्तीच्या वेळेस त्याने सेवाप्रवेश नियमानुसार/शासनाच्या प्रचलित नियमानुसार संबंधित पदाकरीता विहीत केलेली शैक्षणिक अर्हता धारण करणे आवश्यक आहे. शैक्षणिक अर्हता धारण न करणा-या संबंधित बदली कर्मचा-याला त्यांच्या सहमतीनुसार शैक्षणिक अर्हतेची अट नसलेल्या अन्य पदावर सामावून घेण्यात यावे.

२. प्रस्तावांतर्गत कर्मचा-यांची सेवा नियमित करताना सामाजिक व समांतर आरक्षण अंमलबजावणी होणे आवश्यक आहे. त्यानुसार आरक्षित प्रवर्गातील ज्या बदली कर्मचाऱ्यांना संबंधित प्रवर्गात पद उपलब्ध नसल्यास खुल्या प्रवर्गात सामावून घेण्यात येईल. अशा कर्मचा-यांना त्यांच्या मुळ प्रवर्गात भविष्यात रिक्त होणा-या पदांवर सामावून घेण्यात यावे.

३. प्रस्तावांतर्गत बदली कर्मचा-यांना जात वैधता प्रमाणपत्र शासनाच्या प्रचलित नियमानुसार ६ महिन्यांच्या आत सादर करणे आवश्यक राहील. जात प्रमाणपत्र सादर न करणा-या कर्मचा-यास त्याने दिलेल्या शपथपत्रानुसार खुल्या प्रवर्गातील कर्मचारी म्हणून गणण्यात येईल व त्यास आरक्षणाचे कोणतेही लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

४. सदर कर्मचा-यांनी शपथपत्रात नमुद केलेली बाब भविष्यात खोटी आढळून आल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता तात्काळ समाप्त करण्यात येईल.

५. सदर कर्मचा-यांची तात्पुरती सेवा दि.७.१२.२०१५ पासून नियमित करण्यात यावी व या दिनांकापूर्वी त्यांनी बजावलेल्या तात्पुरत्या सेवेचा लाभ कोणत्याही प्रयोजनासाठी अनुज्ञेय असणार नाही.

६. दि.७.१२.२०१५ ते या कर्मचा-यांच्या सेवा नियमित करण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित होवून प्रत्यक्षात नियमित नियुक्तीने सदर कर्मचारी रुजू होईपर्यंतचा कालावधी सेवा प्रयोजनार्थ अर्हताकारी कालावधी म्हणून गणण्यात यावा. दि.७.१२.२०१५ रोजी या कर्मचाऱ्यांची अनुज्ञेय वेतनश्रेणीतील किमान टप्प्यावर वेतननिश्चित करण्यात यावी. या दिनांकापासून सदर कर्मचारी प्रत्यक्षात नियमित नियुक्तीने रुजू होईपर्यंतच्या कालावधीतील वार्षिक वेतनवाढी त्यांना अनुज्ञेय असतील. तथापि त्याबाबतची थकबाकी त्यांना अनुज्ञेय असणार नाही.

७. सदर बदली कर्मचा-यांची सेवा नियमित करण्यासाठी उच्चतम वयोमर्यादेची अट पूर्णत: शिथील करण्यात यावी.

८. सदर बदली कर्मचा-यांची सेवाज्येष्ठता ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांच्या आस्थापनेवरील त्या-त्या संवर्गातील सर्वात कनिष्ठ कर्मचा-यानंतर निश्चित करण्यात यावी.

९. सदर १२ कर्मचा-यांची आपआपसातील सेवाजेष्ठता निश्चित करणे आवश्यक असल्यास ती त्यांच्या प्रथम तात्पुरत्या नियुक्तीच्या दिनांकाच्या आधारे निश्चित करण्यात यावी.

२. सदर आदेश सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१४३२/२०१७/१२ दि.२८.११.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने तसेच दि.२९.११.२०१८ रोजी पार पडलेल्या मा. मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201812181219509413 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dattatray Kamalakar

Digitally signed by Sanjay Dattatray Kamalakar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a76cfb0ddc71b4b173782718f405ed42c0b8e6dd418e6177d1c42b709d14a1b3, serialNumber=8b59cf505330cb5cdd8e984576e0ed9db53f7084057ebf3ca2800ff44519880e, cn=Sanjay Dattatray Kamalakar
Date: 2018.12.19 12:41:32 +05'30'

**सं.द. कमलाकर**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१.महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.

२.मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव

३.मा. राज्यमंत्री, वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव

४संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.

५.अधिष्ठाता, ग्रॅट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई .

६.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

७.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

८.निवड नस्ती, (वैसेवा-४ )